**<u>मुख्यमंत्री ग्रामसडक योजना</u>**
**सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात Batch ३ अंतर्गत पालघर जिल्हयातील रस्त्यांची दर्जोन्नती करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुग्रायो-२०१६/प्र.क्र.६११ /पंरा-७**
बांधकाम भवन, ७ वा मजला, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१
तारीख: ३१ डिसेंबर, २०१६

**<u>वाचा -</u>**

१) शासन निर्णय ग्रामविकास विभाग क्र. ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दि. २८.१०.२०१५
२) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. ग्रासयो-२०१५/प्र.क्र.८/पंरा-७, दि. ११.१२.२०१५
३) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. ग्रासयो -२०१५/प्र.क्र.४०/पंरा-७, दि. ३१.१२.२०१५
४) मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्र. मु.अ./प्रमंग्रासयो /कॅम्प ऑफीस पुणे/६८५/१६,दि. १९.१२.२०१६

**<u>शासन निर्णय</u>**

मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत पालघर जिल्हयासाठी सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात Batch-३ अंतर्गत दिलेल्या उद्दिष्टानुसार पुढे नमूद रस्त्यांच्या कामांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या किंमतीस खालील नमुद केलेल्या अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | तालुका | पॅकेज क्रमांक | रस्त्याचे नाव | लांबी (कि.मी.) | कामाची अंदाजीत रक्कम (रु. लक्ष) | कामाची ५ वर्षे नियमित देखभाल व दुरुस्ती अंदाजीत रक्कम (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | वसई | PAL-०९ | प्रजिमा-४९ ते तिल्लेर कातकरी पाडा रस्ता (LR-३०) | १.३५ | ८१.३१ | ४.९२ |
| २ | | | राममा-८ ते केळीचा पाडा बेलपाडा ते गोवरी पाडा रस्ता (LR-०१) | १.५२ | ६२.२३ | ५.३८ |

| अ. क्र. | तालुका | पॅकेज क्रमांक | रस्त्याचे नाव | लांबी (कि.मी.) | कामाची अंदाजीत रक्कम (रु. लक्ष) | कामाची ५ वर्षे नियमित देखभाल व दुरुस्ती अंदाजीत रक्कम (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|
| ३ | | | मेढे साखरपाडा ते प्लॉटपाडा रस्ता (LR-११) | ३.५२ | १९४.९८ | १२.३१ |
| ४ | डहाणू | PAL-१० | राममा-८ ते भराडसारणी रस्ता (MRL-०९) | ३.२१ | १०८.२३ | ११.२६ |
| ५ | | | राममा-८ ते चिंचले नागझरी बोंडगाव रस्ता (MRL-३९) | ७.४८५ | ३१९.६८ | २६.४६ |
| ६ | | | कैनाड नंदारे ते कंक्राटी रस्ता (MRL-३०) | २.६८५ | ११२.५५ | ९.७१ |
| ७ | विक्रमगड | PAL-११ | रामा-७३ शिळशेत केव ते म्हसरोळी रस्ता (TR-१३) | ८.१२ | ४३७.२९ | २८.४२ |
| ८ | जव्हार | PAL-१२ | जव्हार ते चोंढीचा पाडा रस्ता (TR-२०) | २.१० | १०८.२५ | ७.०९ |
| ९ | | | कोगदे ते रामा-७२ रस्ता (TR-२१) | ६.५१ | २७८.१९ | २३.१७ |
| | | | **एकुण** | ३६.५० | १७०२.७१ | १२८.७२ |

१. सदर कामे ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत, प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर व ग्राम विकास विभागाच्या अटी व शर्तींवर कार्यान्वीत करण्यात यावीत.

२. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना व विभागीय अधीक्षक अभियंता, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना यांनी शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्रमांक प्रमंग्रासयो-२००९/प्र.क्र.११३/योजना-८, दिनांक ०९.०९.२०१० व शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्रमांक प्रमंग्रासयो-२०१२/प्र.क्र.११३/योजना-८, दिनांक २५.०९.२०१२ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार प्रत्येक रस्त्याला तांत्रिक मान्यता द्यावी.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था व मुख्य अभियंता, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना यांनी रस्त्याचे दर्जोन्नती करण्यासाठी ई-टेंडरिंग करुनच कार्यारंभाचे आदेश देण्यात यावेत.

४. प्रस्तुत कामास तांत्रिक मंजुरी देण्यापुर्वी व काम सुरु करण्यापुर्वी पुढील बाबींची पुर्तता करण्यात यावी.

i) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापुर्वी रस्त्याच्या कामाचा वाव, Pavement Design व Hydraulic Calculations पुनश्चः काटेकोरपणे तपासण्यात येवुन त्याप्रमाणे संकल्पन निश्चित करण्यात यावे.

ii) सदर रस्त्यासाठी लागणारी जमीन या विभागाच्या ताब्यात आहे याची खातरजमा करुन घ्यावी. खाजगी जमीन अथवा वन विभागाची ना-हरकत प्रमाणपत्र आवश्यक असलेल्या रस्त्यांची कामे हाती घेण्यात येवु नयेत, याबाबत पुनश्च् खात्री करण्यात यावी.

iii) तांत्रिक मान्यता देणाऱ्या प्राधिकाऱ्याने हे काम कोणत्याही पाटबंधारे / जल विद्युत पाणीपुरवठा प्रकल्पाच्या जलाशयाखाली जाण्याची शक्यता नाही किंवा अशा प्रकल्पांमुळे या कामावर कोणताही परिणाम होणार नाही याची खात्री करावी.

iv) अंदाजपत्रकामध्ये कामाची मराठीमधुन माहिती दर्शविणाऱ्या फलकाची तरतुद केलेली असावी.

v) प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकात प्रत्येक दराचे वर्णन / दर / दर पृथ:करण / रक्कम / दर पृथ:करणातील गृहित धरलेली अंतरे व अनुषंगिक इतर बाबी तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिकाऱ्यांनी त्यांच्या पातळीवर तपासणे अनिवार्य आहे. या संदर्भात शासनाचे कोणतेही उत्तरदायित्व असणार नाही.

vi) तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्याने कामामध्ये प्रस्तावित वाव अन्य कोणत्याही योजनेत / कार्यक्रमात समाविष्ठ नाही तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, महानगरपालिका, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ इत्यादी तत्सम यंत्रणेकडे मंजुर नाही याची खातरजमा करावी.

५. सदर कामावरील खर्च “मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००)(०१) , मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे सीआरसी - ५०५४ ५१५३” या शिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१६१२३१११५५०८५३२० असा आहे. हा

आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2016.12.31 14:00:46 +05'30'

**(दि. बा. पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) जिल्हाधिकारी , पालघर
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , पालघर
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
४) मुख्य अभियंता, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, कॅम्प ऑफीस, पुणे.
५) खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.वि.) मंत्रालय मुंबई ४०० ०३२
६) अधीक्षक अभियंता (सर्व), प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना
७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पालघर
८) कार्यकारी अभियंता, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पालघर
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर
१०) श्री. एस.सी. मोने, वित्तीय सल्लागार, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना
११) माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य
१२) निवड नस्ती ( पंरा-७) ग्राम विकास विभाग.